**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या इंदू मिल, दादर, मुंबई येथील आंतरराष्ट्रीय स्मारकातील ३५० फुट पुतळयास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक २०२१/प्र.क्र.१५/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १० ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, एमआरडी-३३२०/सं.क्र.५२/नवि-७, दि.१०.०९.२०२०.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०२०/प्र.क्र.४० /बांधकामे, दि.९.५.२०२२.
३) मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१६.११.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
४) दि.६.४.२०२३ रोजी गाझियाबाद नवी दिल्ली येथील पाहणी दौरा व त्यानुषंगाने बैठकीचे दि.१७.५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये निर्गमित इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली व मा. उपमुख्यमंत्री महोदयांच्या प्रमुख उपस्थितीत दि.१६ नोव्हेंबर, २०२२ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या परिवारातील सन्माननिय सदस्य, लोकप्रतिनिधी तसेच आंबेडकरी चळवळीतील मान्यवर व्यक्ती यांना सोबत घेऊन इंदू मिल, दादर, मुंबई येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या आंतरराष्ट्रीय स्मारकासाठी उभारण्यात येणाऱ्या ३५० फुटाच्या पुतळयाच्या गाझीयाबाद येथील श्री. राम सुतार यांच्या शिल्पशाळेतील २५ फुटाच्या प्रतिकृतीची पाहणी करुन इंदू मिल मध्ये उभारण्यात येणारा पुतळा अंतिम करण्यासाठी पाहणी दौरा आयोजित करण्याचे निर्देश देण्यात आले होते. त्या अनुषंगाने दि. ०६ एप्रिल, २०२३ रोजी वरील मान्यवरांच्या उपस्थितीत श्री. राम सुतार यांच्या शिल्पशाळेला भेट देण्यात आली.

सदर भेटीदरम्यान मान्यवरांकडून २५ फुटी पुतळयाच्या प्रतिकृतीला सहमती देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने इंदु मिल येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याकरीता, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या ३५० फुटी पुतळयाला मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

दिनांक ०६ एप्रिल, २०२३ रोजी गाझीयाबाद येथील शिल्पशाळेला मान्यवरांनी भेट देऊन पुतळयाच्या प्रतिकृतीस दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन इंदु मिल येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या आंतरराष्ट्रीय दर्जाच्या स्मारकात उभारण्यात येणाऱ्या डॉ.बाबासाहेब आंबेडकर

यांच्या ३५० फुट पुतळयासाठी श्री. राम सुतार यांच्या शिल्पशाळेतील २५ फुटाच्या प्रतिकृतीच्या पुतळयाच्या धर्तीवर ३५० फुटी पुतळा तयार करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०८१०१६४५१३३८२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a4735 6798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA49 3C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2023.08.10 16:47:44 +05'30'

**( अनिल कों.आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४) मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
५) महानगर आयुक्त,मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,मुंबई
६) श्री.राम सुतार, शिल्पकार, शिल्पशाळा, गाझियाबाद,उत्तरप्रदेश
७) प्रा.विश्वनाथ डी.साबळे,डीन,जे.जे.स्कूल ऑफ आर्टस,फोर्ट,मुंबई
८) महालेखापाल,महाराष्ट्र,१,मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
१०) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
११) जिल्हाधिकारी,मुंबई शहर व उपनगर
१२) आयुक्त,बृहन्मुंबई महानगर पालिका,मुंबई
१३) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,मुंबई
१४) सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग,मुंबई
१५) निवडनस्ती (बांधकामे)
१) श्री.अनिल राम सुतार, शिल्पकार
२) श्री. शशी प्रभू, चीफ आर्कीटेक्ट
३) शापूरजी पालनजी कंपनीचे प्रतिनिधी
४) प्रा.विश्वनाथ डी.साबळे,डीन,जे.जे.स्कूल ऑफ आर्टस,फोर्ट,मुंबई
५) डॉ.रूबी मलोनी,शाखा प्रमुख-इतिहास, मुंबई विद्यापीठ